हद्दास पेटून दिला नाहीं. त्या करितां सर्व धर्मादाय, इनामें, आणि पदव्या, त्याच्या घेतल्या आणि त्यास देशाचे हद्दीपार केला. असें विपत्तीचें शासन भोगलें तेणें करून लोकांमध्यें इन्स्तानाचे निर्दोषपणा विषयीं कीर्ति अधिक झाली. नंतर त्याचा पक्ष धरून क्यांतर्बरीचा ओर्चबिशप ओदो नामें होता त्याणें एद्वी आणि एल्गीवा या दोघांमध्यें वियोग व्हावा असा हुकूम केला.-

धर्माध्यक्षाचे आज्ञेशीं विरुद्ध राजाचानें आचरण करवेना, म्हणून त्याणें आपली सुंदर बायको टाकायास कबूल केली. तेव्हां ओदोनें राजाचा वाड्यांत शिपाई पाठविले, त्याणीं राणीला धरून लोखंड तापवून तिचे तोंडावर डाग दिला. एवढ्या दुष्टकर्में करून ही संतोष न पावून त्याणीं धट्टाईनें तिला अयरलंडांत नेली; आणि तेथे नेहमी रहायाचा हुकूम केला. त्या पतिव्रतेस, ही आज्ञा मानणें हें मोटें संकट पड-

१ आर्चबिशप म्हणजे मुख्य धर्माधिकारी

लें. जरी ती तेथें होती तरी राजावर तिचा पती सारिखा भाव होता म्हणून, तोंडावरचा डाग बराझाला; आणि तिचें शरीर विशोभित दिसण्या करितां-दुसऱ्या जा खुणा केल्या होत्या त्या गेल्यानंतर, ती राजा जवळ एक वेळ आली- परंतु विपत्तीनें तिची पाठ सोडिली नाहीं. क्यांतर्बरीचे आर्चबिशपानें ती काय करील त्याचा शोध कराया करितां एक मंडळी नेमली होती; त्याणीं तिला धरून बंदीस घातली; आणि तिचे नंगड्यांचे सांधे कापले अशा भयंकर रीतीनें तिचा वधकेला- त्याच वेळेस एड्वी राजास्हडी चोहोंकडून बुडवायाचीं संधानें चोकून चाललीं होतीं, त्या पक्षांत मुख्य तो डनूस्तन मर्क्त होता. शेवटीं त्याणीं उघड बंड आरंभिलें; राजाचा धाकटा भाऊ एडगर नामें एक वर्षांचा होता, त्यास त्योंनीं आपला मुख्य करून उत्तरे कडचा सर्व राज्याचा धनीपणा दिला. एड्वी राजानें आपलें सामर्थ्य, व आपले इष्ट, उत्तरोत्तर कमी होत चालिले असें पाहून, राज्याचे

९१ च्चे विभाग केले, परंतु तो मग लवकरच्च मृत्यु पावला, तेणें करून त्याचे शत्रूंचे मनोरथ सफळ झाले; आणि सर्व राज्य एड्गरास प्राप्त झालें.

महंताचे सामर्थ्यानें एड्गरास राज्य मिळालें म्हणून तो जें कांहीं करी तें त्याचे आज्ञे वांचून करीत नसे.

या राजाचा कथेंत विशेष चमत्कार नाहीं; परंतु एलफ्रिडेचें आणि त्याचें लग्न कोणत्या युक्तीनें झालें ती गोष्ट मोठी विचित्र आहे, म्हणून ती एथें सांगतों. डेवन प्रांताचे अर्लाची एक एलफ्रिडा नामें मुलगी होती, तीचा सौंदर्याची राजानें मोटी कीर्ति ऐकिली, परंतु त्या विषयीं लोकांचा गप्पांवर विश्वास ठेवावा हें त्यास चांगलें न वाटून, त्याणें आपला एक परम स्नेही एथेलवालड नामें होता त्यास तेथें पाठविलें; आणि सांगीतलें कीं, जशी बातमी ऐकतों तशीच एलफ्रिडा आहे किं नाहीं, हें पाहून मला येऊन सांग. एथेलवालड अर्लाचे घरीं गेला,

तथे

तेथें त्या मुलीला पहातांच तिजविषयीं अत्यंत सका-
म झाला. त्याला असा अतिशय काम उत्पन्न
झाला कीं, आपले धन्याची आज्ञा लक्षांत न आ-
णितां, त्याणें आपलेंच हित पाहिलें; आणि त्या
सुंदरीचे बापाकडे तिला आपल्या करितां मागी-
तली. तो राजाचा मित्र पडला म्हणोन त्यांस
नाहीं असें कोण म्हणतो ? अर्लोनें होय म्हट-
लें: आणि त्या दोघांचें लग्न गुप्तपणीं झालें. म-
ग लवकरच त्याणें राजाजवळ येऊन सांगीतलें
कीं, त्या मुलीची इतकी कीर्ति व्हायाचें कारण सं-
पत्ति आणि गुण. मला मोठें आश्चर्य वाटतें कीं,
लोक तिचा सौंदर्याचें उगीच इतकें वर्णन करि-
तात— तें ऐकून राजाची खातर झाली, आणि
त्याणें मग तिची कधीं गोष्ट पुनः काढिली नाहीं.
तेणें करून एथेलवाल्डाचा मनांत परम संतो-
ष झाला. अशी लबाडी करून राजाचा मनांतून
ती गोष्ट अगदीं गेली असें पाहून, एके दिवशीं
त्याणें एलफ्रिडेची गोष्ट काढली; तो म्हणाला

कीं

कीं हे राजा डेवन यांचे अर्लाची मुलगी राजास योग्य नाहीं ही गोष्ट तर खरी; परंतु राजाचा सेवकास ती प्राप्त झाली तर त्याचें मोठें दैव. म्हणून मी आपणास प्रार्थना करितों कीं तिशीं लग्न करायास मला परमाणगी असावी, कारण, ती आपले द्रव्याची मालक आहे तेणें करून मी द्रव्यवान होईन. ही विनंती राजास चांगली वाटून, त्याणें त्यास मोकळीक दिली. मग तो आपले बायकोजवळ जाऊन फिरून उघडपणानें लग्न करिता झाला. तो तिला राजाचा घरीं न येऊं द्यायाकरितां फार जपत असे. तो राजा स्त्री लुब्ध आहे म्हणोन आपले बायकोस पाहून मोहित होईल, असें जाणून ती राजाचा दृष्टीस न पडावी याकरितां त्याणें मोठी सावधगीरी राखिली होती-परंतु ती त्याची चुधाई फार दिवस लपून राहिली नाहीं- एके दिवशीं राजास तें सर्व वर्तमान समजलें; परंतु त्याणें त्या वेळेस आपला क्रोध आवरिला. पुढें एके दिवशीं ती अमानुष सुंदरी

जेथे

जेथे होती त्या ठिकाणाजवळ सहज जायाचा बेत केला- त्याणें **एथेलवालडास** बरोबर बोलाविलें; तो मोठ्या संकटानें गेला, राजा त्या ठिकाणीं आऊन **एथेलवालडास** बोलिला कीं अरे, जीचा सौंदर्याची मी पूर्वीं इतकी कीर्ति ऐकिली होती. अशी जी तुझी बायको, तिला पहायाची माझी इच्छा आहे. तर तिज जवळ तूं मला आपुला मित्र ह्मणोन घेऊन जा. ही गोष्ट ऐकतांच **एथेलवालडाचें** काळीज थरथरलें-त्याणें राजाच्या बेत मोडाया करितां बहुत गोष्टी सांगीतल्या; परंतु राजा ऐकेना. शेवटीं तो बोलिला. बरें तर इतकें तरी करा कीं, मला पूर्वीं घरीं जाऊन यायाची मोकळीक द्या; ह्मणजे मी तुमच्या येण्याची कांहीं तरतूज करून ठेवीन. राजानें त्यास घरीं जायास आज्ञा दिली, मग तो जाऊन आपले बायकोचे पायां पडला, आणि जी आपण लबाडी केली ती, सर्व तिजजवळ सांगता झाला; त्याणें तिची प्रार्थना केली

कीं.

कीं तूं आपलें सौंदर्य जितकें लपवेल तितकें लपी-
व. तें ऐकून एलफ्रिडेचा मनांत मोटा राग आ-
ला, कारण, तिला राज्य प्राप्त व्हावयाचें होतें तें त्या-
णें बुडविलें; तथापि तिणें त्या वेळेस होय म्हट-
लें; परंतु तो गेल्यानंतर तिणें मोट्या चतुराईनें
आंगावर अलंकार घालून शरीर फारच सुशोभि-
त केलें; पुढें तिचा मना प्रमाणेंच गोष्ट घडली.
राजा तिला पहातांच अतिशय मोहित होऊन
तिला आपले घरीं आणावी असा निश्चय करि-
ता झाला. मग त्याणें आपली मसलत एथेल-
वाल्डास कळूं नये म्हणून मनांत उत्पन्न झा-
लेला काम त्यास कळविला नाहीं, आणि सहज
रीतीनें निरोप घेऊन तेथून निघून गेला. परंतु
त्याचा मनांत एथेलवाल्डाचा पुरतेपणीं सूड
उगवावा असें आलें म्हणून थोडे दिवसांनंतर
एथेलवाल्डास कांहीं मोटें कामाचें निमित्त
करून नर्थंबर्लंडांत पाठविलें त्या वाटेंत एके
रानांत त्याचें प्रेत सांपडलें- कितिएक म्हणता-
त

त कीं राजानें त्यास आपले हातानें मारिला, कित्येक ह्मणतात कीं राजानें त्यास मारावयाचा हुकूम मात्र दिला होता- हें कसेंही असो; परंतु मग लवकरच राजाचा आज्ञेनें एलफ्रिडेस दरबारांत आणिली; आणि त्या दोघांचें मोठ्या उत्साहानें लग्न झालें.

हा राजा १६ वर्षें राज्य करून तेतिसावे वर्षीं मृत्यु पावला. मग त्याचा पहिल्या बायकोचा एडवर्ड नामें मुलगा होता तो राज्य करूं लागला.

महंतास एडवर्ड राजाचा पक्षपात होता ह्मणून त्यास राज्य प्राप्त झालें त्याचें नाव मग मार्टिर असें पडलें होतें; तो राज्य करूं लागल्यापासून चार वर्षें जवंत होता. त्याचा राज्यांत कांहीं चमत्कार झाला नाहीं- त्याचा भयंकर आणि स्मरणीय असा मृत्यु मात्र फारच विलक्षण

मार्टिर शब्दाचा अर्थ साक्षी, परंतु या शब्दाची रूढी जो आपले धर्माकरितां मरतो त्याचे ठायीं आहे.

झाला

झाला. तो एके दिवशीं **कार्फि क्यास्टिला** जवळ पारधी करायास गेला होता, तेथे त्याची सावत्र आई **एलफ्रिडा** रहात होती. त्यास वाटलें कीं तिला भेटून जावें हा आपला धर्म होय—मग तो एकटा तेथे गेला, आणि त्याणें तहान लागली ह्मणून कांहीं प्यावयास मागून घेतलें; तें पात्र त्याणें तोंडा जवळ धरलें होतें इतक्यांत, **एलफ्रिडेचा** एके चाकरानें येऊन त्यास पाठींत भोंसकलें. तें तिणें चाकरास आगोदरच शिकवून ठेविलें होतें—वार लागतांच तो घोड्यावर बसून पळत निघाला. त्याचे शरीरांतून रक्त वाहत होतें तेणेंकरून मूर्छित होऊन तो जिनावरून खालीं घसरला त्याचा पाय रिकबींत अडकला होता त्या मुळें घोडा जिकडे जिकडे जाई तिकडे तिकडे तो ओढत जाई असा तो शेवटीं मेला.

त्यानंतर दुसरा* **एथेलरेड**; जो **एलफ्रि-**

* पूर्वी एथेलरेड या नावाचा एक राजाची कथा सांगीतली. हाही दुसरा त्याच नावाचा राजा झाला. पुढें ही सर्वत्र असेंच आणावें.

डेचा

डेच्या ठायीं एड्गर पासून झाला होता, तो राज्य करूं लागला. तो भोळा आणि अविचारी होता; त्यास राज्य करायाचें किंवा राज्याचा बंदोबस्त करायाचें सामर्थ्य नव्हतें. त्याचा राज्यांत जे पूर्वीचे भयंकर शत्रू डेन लोक, ते दिवसेंदिवस पाय सरकावीत चालिले. तो राजा भोळा होता आणि त्यास विशेष कशाचा अनुभव नव्हता ह्मणून, त्यांस पुनः स्वारी आणि लूट करायास संधी सांपडली ते ब्रिटेन बेटाचे कांठावरचे कितिएक ठिकाणीं येऊन उतरले, आणि दांडगाईनें लुटूं लागले.

डेन लोक इंग्लिशां मध्यें मिसळून होते ह्मणून इंग्लिशानीं अशी मसलत केली कीं त्या सर्वांस एकदांच मारावे. एथेलरेडानेंही चातुर्यानें सर्वांस मारायाची ती मसलत कबूल केली. अशी मसलत भोळ्या राजाचे राज्यांत कचित् घडते. ती त्याणीं अशी गुप्त केली होती कीं, इंग्लंडा मध्यें जितके डेन होते तितके सर्व एके दिवशीं मारले गेले तेव्हां फुटली. लुच्चाईनें जा-

ध्या बेत केला आणि जो निर्दयपणानें सिद्धीस नेला, असा जो हा सर्व वध, तेणें करून इंग्लिश निर्भयत- र झाले नाहींच; परंतु त्यांचें दुःख उलटें अधिक वा- ढलें.–

फार दिवसांचे शत्रूंचा उपद्रवापासून आप- ली अशी सुटका झाली म्हणून ते आनंदांत निम- ग्न होते, इतक्यांत, डेनमार्क देशाचा राजा स्वेन या नामें होता त्यास या लुच्चाईचें वर्तमान समजलें. तो क्रोधानें संतप्त होऊन बहुत गलबतें घेऊन ब्रि- टेनाचा विध्वंस करावा या बेतानें पश्चिमेकडचा कांठावरून आला. त्यावेळेस एथेल्रेड राजा नार्मेंडी प्रांतांत पळून गेला; मग सर्व देश स्वेन राजाचा अमलाखालीं आला.–

नंतर केन्यूट ज्याचें प्रतिष्ठानाव मग के- न्यूट दि ग्रेट असें पडलें, हो तो डेनमार्कीचा राजा झाला; आणि इंग्लंड देशांत जी डेन लोकांची फौज होती तिचाही धनीपणा त्यास प्राप्त झाला– एथेल्रेड वारल्यानंतर त्याचे

ठिकाणीं

१०२६ ठिकाणीं त्याचा मुलगा एडमंड ऐरैन सैड झाला. मग. केन्यूट आणि एडमंड या दोघांमध्यें युद्ध फार दिवस चाललें होतें- प्रथमची लढाई समसमान झाली. दुसरींत डेनाचा जय झाला; तथापि एडमंड राजाचा पुनः फौज जमवून लढाई करावी असा बेत पाहून, डेनाचे आणि इंग्लिशांचे सरदारांनी कंटाळून आपआपले राजां करिवणें राज्याचे दोन भाग करून सल्ला केला. केन्यूट राजानें राज्याचे उत्तरेकडील प्रदेश आपण घेतले आणि दक्षिणे कडचे एडमंड राजास दिले. परंतु थोडे दिवसांनंतर आक्सफर्ड शहरांत एडमंड राजास त्याचे दोघां चाकरांनीं मारिला, तेणें करून तें सर्व राज्य आपाप केन्यूट राजाचे हातीं आलें.-

केन्यूट राजा त्या काळचे लोकांत फार चांगला होता असें कित्येक ग्रंथकारांनीं वर्णन केलें आहे- थोरपणांतली ईश्वर भक्ती. आणि ता-

* लोखंडा सारिख्या जाचा कुशी तो. हें नाम त्याचे शौर्यावरून पडलें.

रुण्यांत

रुण्यांत महान् शौर्य या गुणा विषयीं सर्व लोक त्याची प्रशंसा करीत असत. खुशामती लोकांचें म्हणणें असें पडत असे कीं, या राजाची शक्ती अबाधित आहे; आणि पंचमहाभूतादि कर्डूही याचे आज्ञे प्रमाणें वागतील. अशी लोक आपली खुशामत करितात हें समजून त्याणें त्यांची फजीती कराया करितां ही युक्ती केली. एके दिवशीं भरतीचा समय पाहून त्याणें आपली खुर्ची समुद्र काठीं नेऊन ठेवायास सांगीतली, आणि आपण जाऊन तेथें बसला. आणि बोलिला." अरे समुद्रा तुजवर माझी सत्ता आहे. मी ज्या भूमीवर बसलों ती माझी आहे, तर मी तुला आज्ञा करितों कीं तूं पुढें येऊन धन्याचे पाय भिजविशील तर खबरदार" समुद्र आपली आज्ञा ऐकेल असा भरंवसा दाखविण्या करितां त्याणें कांहीं वेळपर्यंत आपण तेथे बसून दाखविलें. शेवटीं चोहों कडून लाटा येऊं लागल्या तेव्हां आपल्या दरबारी लोकांस बोलिला कीं हें पाहिलेंत ना?

ईश्वर

ईश्वर आणि सार्वभौम असें त्यासच म्हणावें, कीं ज्याचे आज्ञेंत समुद्र आणि पृथ्वी हीं दोन ही वागतातः त्यापुढें मनुष्याचा पाड काय - अस्तु, लोक त्या राजाचें भय फार वागवीत; आणि त्याचे गुणावरून त्यावर प्रीतीही तशीच करीत असत. असा तो राजा बहुत वर्षें पर्यंत होता. पराक्रमावरून त्याचें नाव केन्यूटदिग्रेट् असें पडलें होतें. परंतु त्याचा गुणासही तें योग्य होतें. तो एकुणीस वर्षें
स०१०३५ पर्यंत राज्य करून शाफ्ट्स्बरींत मृत्यु पावला. आणि तीन पुत्र होते त्यांचीं नावें स्वेन, हारोल्ड, हार्डिकेन्यूटः त्यांत स्वेन, नार्वे देशाचें राज्य करूं लागला, हार्डिकेन्यूट, डेनमार्कचा तक्तावर बसला. आणि हारोल्ड, इंग्लंडांत आपले बापाचे ठिकाणीं राजा झाला.

१०३९ हारोल्डा नंतर त्याचा भाऊ हार्डिकेन्यूट इंग्लंडांत राज्य करूं लागला. तो राजा डेन आणि इंग्लिश या दोघांनीही कबूल केला तो देशांतून आला तेव्हां त्याचा लोकांनी मोठा आ-

दूर केला. परंतु त्या राजाचें अन्यायराज्य फारदिवस राहिलें नाहीं. तो राज्य करूं लागला त्या पासून दोन वर्षांनी एके डेनिश लार्डाचें[1] लग्न लांबेथ शहरांत झालें तेथें विशेष खाण्याचे पिण्यामुळें मृत्यु पावला.

डेनिश राजाची अशी गडबड पाहून इंग्लिशांही एक साक्सनी वंशांतील पुरुष राज्यावर बसवावा असा निश्चय केला. आणि एडुवर्ड, ज्याचें प्रतिष्ठानाम सत्यवक्ता असें पडलें होतें त्यास सर्वांचे संमतानें राजा केला.

१०४७ इंग्लिश लोक फार दिवस परकी राजाच्या अमलाखालीं राहून कंटाळले होते, त्यांस आपले जुने राजाचे वंशांतला राजा झाला पाहून परम हर्ष झाला. तो नार्मन दरबारांत उत्पन्न झाला होता ह्मणून त्या देशाच्या चाली, रीति, आणि त्या देशचे लोक यांविषयीं त्यास मोठा पक्षपात होता. त्याणें गाडिन या नावाचे पुरुषाची एडेथा ह्मणून मुलगी होती तिशीं लग्न केलें; परंतु जन्मवर त्याणें नि-

१ लार्ड ह्मणून अमात्यांत शेवटची पदवी आहे.

शीं कधीं संग केला नाहीं. त्याचें कारण, दांभिक ईश्वरभक्ति, किंवा स्त्रियांचा द्वेष या दोहोंतून एक असेल.

त्यास औरस पुत्र नव्हता त्याचें राज्य फार दिवस चालिलें त्या मुळें, त्याचें मन कुतर्कांनीं व्याप्त झालें होतें. त्याणें पंचवीस वर्षें राज्य केलें; शेवटीं कांहीं रोग होऊन तो पांसष्टावे वर्षी जान्युआरी महिन्याचे पांचवे तारिखेस मृत्यु पावला.

त्यानंतर गाद्विन सरदाराचा मुलगा हारोल्ड नामें होता तो राज्य करूं लागला. त्याचा युक्ती आणि गुण हीं पाहून तो राज्य करायास योग्य असें दिसत होतें म्हणून, त्यास राज्य प्राप्त व्हायास कांहीं विघ्न झालें नाहीं; परंतु अधिकार नसतां जें राजासन मिळविणें त्याचे मागें अवश्य प्राप्त होणारीं जीं संकटें त्यां पासून; त्या राजाचें रक्षण, शौर्य, नीति, आणि लोकप्रियता, या त्याचे गुणांनी केलें नाहीं. नार्मंडी देशांतील ड्युक*

* ड्युक म्हणजे अमात्यांत पहिली पदवी आहे हें पद वंशपरंपरेनें चालतें.

क. **उइलियम** या नामें एक पुरुष होता तो ह्मणूं लागला कीं, **एड्वर्ड** राजानें राज्य मला दिलें आहे तें भोगायास यास अधिकार नाहीं – ज्याचें प्रतिज्ञानाव विजयी असें पडलें होतें असा जो **उइलियम** तो **नार्मेंडी**चा **राबर्ट** नामें **ड्युक** होता त्याचा पुत्र. त्याचे आईचें नाव **आर्लिट**. ती स्त्री **फालइज** शहरांत फार सुंदर होती. ती एके दिवशीं **राबर्ट** वाटेनें जात होता त्यास पहात दरवाजांत उभी राहिली होती, तिज [illegible] सकाम झाला – अशा रीतीनें जो जन्मला **उइलियम** तो थोरपणास चढला हा त्याचा जन्मगुण ह्मणावा, परंतु तो त्याचा बुद्धीचाच गुण ही गोष्ट खरी. त्याचें शरीर बळकट, त्याची बुद्धी तीक्ष्ण आणि थोर, त्याचें शौर्य असें कीं, मोठा भयाचा प्रसंग पडला तरी तो घाबरत नसे. तो आपले बापाचे ठिकाणीं बसला त्या वेळेस लहान होता तरी त्याणें बंडवाले लोकांवर चक बशिवला; आणि बाहेरून जे कोणी येऊन दंगा करीत असत त्यांचेंही निवारण

केलें

केलें. तो सर्व कर्मे आपलें तेज राखून नीतीनें करीत असे. आपलें राज्य असें स्वस्थ झालें पाहून तो उत्तरोत्तर अधिकाची इच्छा करूं लागला. सत्यवक्ता एडुवर्ड राजा, याणें आपलें राज्य कोणास द्यावें ह्याविशीं शेवटीं कांहीं विचार योजिला होता. तो उइलियमास समजला तेणेंकरून इंग्लंड देशांतलें राजासन आपणास प्राप्त व्हावें असा लोभ त्याचा मनांत उत्पन्न झाला. पोप आणि दुसरे कितिएक लोक याणीं त्यास राज्याचा अधिकार आहे असा आग्रह धरिला होता. उइलियम वास्तवीक राज्याचा अधिकारी दिसत होता म्हणून, किंवा धर्म प्रकरणांतील अंमल अधिक वाढवावा या इछेनें, पोप असें बोलिला कीं, हारोल्डास राज्याचा अधिकार नाहीं.

अशा अनेक अनुकूल गोष्टी घडल्यामुळें उइलियमाजवळ निसडक आणि युद्धास तयार अशी साठहजार फौज जमा झाली. त्या फौजेस तीनशें गलबतांत बसवून तो ग्रीष्म ऋतूच्या प्रारंभीं

इंग्लंड देशास जायास निघाला. त्या वेळेस वारा किंचित् प्रतिकूळ होता तेणें करून त्यास थोडासा प्रतिबंध झाला. तो ससेक्स प्रांतांत पेवेन्सी गावांत येऊन स्वस्थ मनानें उतरला.

त्या समयीं नार्वेजियन[1] लोक मुलुखांत दंगा करीत होते त्यांस जिंकून, मोठ्या हर्षानें हारोल्ड राजा परत येत होता. त्याणें असा निश्चय केला होता कीं, राजपद द्यायाचा अधिकार लोकांकडे; तेव्हां त्याणीं जी राजपदवी मला दिली ती मी सर्वस्व खरचून राखीन. असा दृढ निश्चय करून तो,जी बरोबर फौज नेली होती ती,आणि दुसरी देशांतून जितकी जमा झाली तितकी घेऊन येत होता. त्याचा फौजेंतले लोक शूर, उद्योगी, थोरमनाचे, असे होते; त्यांची राजावर प्रीति होती; आणि त्यांस लढाई विषयीं मोठी हौस; तिकडे उइलियम राजाची फौज कशी होती कीं जशी युरोप देशांतून निवडूनच काढली काय? त्यांस दुःख आणि श्रम यांची संवय पडोन गेली होती. ब्रिटन

१ नार्वे म्हणून डेनमार्क जवळ देश आहे तेथील लोक.

बोलान, फ्लांडर्स, पाइटु, मेन, आर्लियन्स, फ्रान्स, आणि नार्मेंडी इत्यादि देशांतले लोक आपले इच्छेनेंच येऊन त्यास मिळाले होते. इंग्लंड देशाचे रा[illegible]करितां लढाई करायास अशा दोहींकडच्या फौजा पूर्वी कधीं सिद्ध झाल्या नव्हत्या, आणि त्यापुढें ही कधीं झाल्या नाहीं. लढाईचा पूर्वे दिवशीं राजा उइलियमानें हारोल्ड राजास सांगोन पाठविलें कीं, तुमची आमची हात लढाई करून तंटा मिटवू[illegible], म्हणजे पुष्कळ लोकांचे प्राण वांचतील. [illegible] हारोल्डानें मान्य केली नाही, आणि बोलिला; सैन्याचा निश्चंता ईश्वर आहे तो मर्जीस येईल तसें करील. त्या रात्रीस दोनही सैन्यें एकमेकाचे समोर दृ[illegible]चा टप्पांत अरुणोदयाची वाट पहात तळ देऊन राहिलीं. इंग्लिश लोकांनीं ती रात्र गाधनांत आणि [illegible]पिण्यांत घालिवली. नार्मनानी ईश्वराचे भजन आणि स्तव यांत घालिवली.—

दुसरे दिवशीं सकाळचे दोन घटिका दिव-

सास दोनही सैन्यें तयार होऊन एकमेकावर च-
ढून गेलीं- **हारोल्ड** राजा आपले फौजेचे मध्या-
वर राहून पायीं चालिला होता; कारण, फौजेनें स-
मजावें किं आपल्या राजास ही आपल्यासारिखेंच
भय आहे; आणि तीस अधिक धीर यावा. **उइ-
लियम** घोड्यावर बसून आपली फौज चालवीत
त होता. त्याचे देशांत एक मोटा **रोलंड** या नावा-
चा शूर पुरुष झाला होता, त्याची कीर्ति गातगात
त्याचें सैन्य चालिलें होतें- **नार्मन** लोक धनुष्यां-
नी लढाई करूं लागलें, तें पाहून **ब्रिटन** लोकांस
मोठें आश्चर्य झालें, आणि त्यांचा रांगा जवळ ज-
वळ असत म्हणून बाणांनी त्यांचा पुष्कळ नाश हो-
उं लागला; परंतु ते अगदीं नजीक येऊन ठेपलेत्या-
वेळेस **इंग्लिश** लोक आपले परशूनीं त्यांचा नाश
करिते झाले- तेव्हां **नार्मन** फौजेंत जिकडे तिकडे
धांदल झाली, असें राजा **उइलियमानें** पाहिलें;
आणि तो आपल्या सैन्याचा नाश जवळ आला अ-
सें पाहून बरोबर कांहीं निवडक मंडळी घेऊन सै-

न्यास

न्यास राखाया करितां गेला. तेणें करून सैन्यास धीर आला— तो जिकडे तिकडे शत्रूचा रांगा मोडाया विषयीं उद्युक्त असा दिसत होता. त्याचा खालचे तीन घोडे ठार मेले— इंग्लिश लोकांचें सैन्य अभेद्य पाहून, त्याणें शत्रूंस ठकवाया करितां पड घेतली असें दाखविलें, तें पाहतांच लागल्याच इंग्लिशांचे सैन्याचा रांगा अस्ताव्यस्त झाल्या— तेव्हां उइलियम राजानें ती संधी साधली; त्याणें खूण करितांच आपलेच त्याचे लोक पहिल्या पेक्षां अधिक आवेशानें लढाई करूं लागले; त्याणीं इंग्लिशांची फळी फोडली; आणि त्यांचे पाठीस लागले अशा विपत्तिसमयांतही हारोल्ड राजा, या रांगेंतून त्या रांगेंत फिरून आपल्या फौजेस धीर देऊन त्यांस बंदोबस्तानें उभे करी असें दिसत असे. असें त्याणें सारादिवसभर केलें, आणि रात्रीचा प्रारंभीं केंटिश* लोकांपुढें उभा राहून त्यांस यथास्थित उभे करीत होता. इतके श्रम करूनही तो थ-

---

* केंट प्रांतांतले लोक

कला नाहीं– या रीतीनें पुनः एकवेळ नार्मनांचा पराजय घडावा असा योग दिसू लागला– त्यांचे पुष्कळ लोक पडले– या रीतीनें जेंव्हां जेव्हां सैन्याचें धैर्य सुटत असे, तेव्हां तेव्हां त्या दोन सरदारांचें शौर्य आणि स्थिर प्रतिज्ञता याहीं करून ती लढाई पुनःपुनः चालू होई, शेवटीं शौर्यानें जी लढाई संपेना ती दैवानें संपली. नार्मनांचे हत्यार बंद पायदळावर चढून हारोल्ड राजा आपले फौजेसहीत जात होता, इतक्यांत त्याचे डोक्यास बाण लागून तो मृत्यु पावला; आणि त्याचे दोन शूर भाऊ त्याचे बाजूस लढाई करीत होते त्यांची ही अवस्था तशीच झाली. त्याचा हातांत तरवार होती तसाच तो प्रेताचे ढिगांत पडला होता; लढाई संपल्यानंतर राजाचें प्रेत कोणतें हेंही समजायाचें कठीण पडलें.

या प्रमाणें नार्मनांचा जय होऊन, इंग्लंड देशांत जें साक्सनांचें राज्य सहाशें वर्षां पर्यंत चालिलें होतें, त्याची समाप्ती झाली.–

## प्रकरण ४

### उइलियम दि कांकरर[1] राजाची कथा



राजा उइलियम, वालिंगफोर्ड शहराजवळ टेमूस नदी उतरून येतो आहे, इतक्यांत स्तिगंड आर्चबिशप म्हणजे मुख्य धर्माध्यक्ष होता, तो त्यास भेटोन बोलिला कीं, आम्ही धर्माचे सर्व अधिकारी तुला अनुकूळ आहों. मग तो राजा शहराजवळ दृष्टीचा टप्यांत येऊन पोहोंचला तंव, तेथील सर्व मुख्य सरदार त्याचे लष्करांत गेले; आणि बोलिले कीं, आम्ही तुझ्या आज्ञेंत वागायास सिद्ध आहों. मग जें राज्य आपले पूर्वजांतून कोणासही वकुत लढाया केल्या वां-

---

१ कांकर म्हणजे विजयी त्याचा इंग्लंडांत जय झाला म्हणून त्यास हें नाव पडलें होतें.

भून प्राप्त झालें नाहीं, तें आपण स्वल्पायासें करून साध्य केलें; यास्तव उइलियम राजास मोटा हर्ष झाला.

त्याचा राज्य प्राप्तीस सद्दारुआ झावी, म्हणून यार्कीचा आर्चबिशपानें वेस्तमिनस्तर शहरांत त्यास राज्याभिषेक केला. त्या समयीं त्याणें डेन आणि साक्सन लोक यादोघांचा चाली प्रमाणें शपथ घेतली; ती अशीकीं, मी धर्मपक्ष यथास्थित रक्षण करून; राजाचा रीती प्रमाणें वर्तेन; आणि पक्षपात संडून राज्य कारभार करीन. असें राज्य संपादन करून तो, प्रताप आणि दया या दोन गुणें करून, इंग्लिशांस वश्य करिता झाला. मग पुनः एकवेळ आपले देशीं जाऊन, पुरातन प्रजांपासून, प्रशंसा आणि आनंद यांचा अनुभव घ्यावा; असें मनांत आणून तो तेथे जाता झाला.

राजा उइलियम स्वदेशीं गेला तेणें करून इंग्लंडांत मोटा अनर्थ झाला. तो असा

राजाचे

राजाचे सेवकांनीं प्रतिबंध नाहींसा झाल्यामुळें प्रांतांत दंगा आरंभिला; आणि इंग्लिश ही निर्भय होत्साते, आपला स्वतंत्रपणा साध्य करायास राजा एथें नाहीं ही चांगली संधी आहे, असें समजून उद्योग करूं लागले.

त्या समयीं इंग्लिशानीं असा कावा केला होता कीं आशवेडनिस्डेचे[1] दिवशीं देवसेवेचे वेळेस सर्व नार्मन लोक हत्यारें ठेवतील; त्या वेळेस, त्यांस मारून टाकावे. इतक्यांत देशाहून उइलिअम आला म्हणून, ती त्यांची मसलत फसली गेली. तेव्हां पासून तो इंग्लिशांचा विश्वास मानीनासा झाला, आणि मनांत पक्कें समजला कीं, हे आपले नेहमीचे शत्रू होत; यांचा मनांतला द्वेष कधींही जायाचा नाहीं. त्याणें राज्यांत बहुत किल्ले बांधिले होते, आणि इंग्लिशांचा एकजूट नव्हता, तेणें करून अकस्मात्

1 फेब्रुआरी महिन्यांत एक बुधवार येतो त्याचें नाव. तो इंग्लिशांचा भजनकरायाचा दिवस असतो.

येऊन ते एकादी गडबड करितील, याचें त्यास भय नव्हतें. त्याणें पाहिलें कीं, यां लोकांची दया करून फळ नाहीं; यांस निर्दयपणानें वागिवलें पाहिजे; तर आतां आपण, आपला व आपले लोकांचा स्वार्थ साधायास प्रवृत्त व्हावें; आणि जे कोणी प्रतिबंध करितील त्यांचा उपशम करावा. मग तो साधारण[1] इंग्लिशांचीं वतनें जप्त करून उदारपणानें आपले नार्मनास देऊं लागला. या रीतीनें सर्व जुने प्रतिष्ठित गृहस्थ भिकेस लाविले, तेणें करून इंग्लिशांस प्रतिष्ठा आणि थोरपणा प्राप्त व्हायाची कोणतीच वाट राहिली नाहीं.

आतां धर्माध्यक्षही आपल्यास अनुकूल असावे, म्हणून धर्मप्रकरणीचा मुख्य मुख्य स्थानीं तो आपले देशचे लोक ठेवूं लागला. स्तैगंड

१ इंग्लंडांमध्यें लोकांचा स्थिती तीन गणिल्या आहेत; उत्तम, साधारण, आणि निकृष्ट. या स्थिति संपत्तिमूलक आहेत.

नामें **क्यांटर्बरीचा आर्चबिशप** होता असें पूर्वी सांगितलें, त्यास त्याणें कांहीं लहानसीं निमित्तें करून पदच्युत केलें.

या प्रकारें कितिएक बंडें मोडून, दुष्ट होते त्यांचें शासन करून, राजा **उइलियम** आपलें राज्य निर्भय करिता झाला. मग त्याणें असा बेत केला कीं, आपण इतके दिवस श्रम केले; अतःपर स्वस्थ रहून सुखाचा अनुभव घ्यावा. त्यास वाटलें कीं आपलें उत्तर वयीं तरी राज्यांत स्वास्थ्य आणि समृद्धी हीं संपूर्णपणें रहातील. परंतु मनुष्याचे आशेवर कांहीं प्रमाण नाहीं; याची प्रचीती **उइलियम** राजाची कथा पुढें लिहिली आहे त्यावरून स्पष्ट येते. जे शत्रु होतील असें त्याचे गांवीं ही नव्हतें तेच त्यास शत्रु झाले; तेणें करून त्याचे वयाचा शेवट कडू झाला. शेवटीं त्यास स्वपुत्रांपासूनच खेद प्राप्त झाला; कीं ज्यांचा पराजयानें कीर्तीची किंवा द्रव्याची त्यास आशा नव्हती. त्या **उइलियम** राजास पुत्र तीन होते त्यांचीं नावें,

**राबर्ट, उइलियम,** आणि **हेनरी**; तशाच कितिएक मुलीही होत्या. त्याचा वडील मुलगा **रा-बर्ट**; त्याचे पाय आखूड ह्मणून त्याचें नाव **कर्थोस** असें पडलें होतें. तो आपले वडिलासारिखाच शूर होता; परंतु त्याचे आंगीं शहाणपणापेक्षां दांडगेपणा विशेष होता – तो आपले भाऊ **उइलियम** आणि **हेनरी** यांचा द्वेष करीत असे. त्या दोघांनी यत्न करून बापाचा विश्वास आणि प्रीति संपादिली होती, ह्मणून **राबर्ट** त्यांशीं फारच वांकडा चाले – या प्रकारचें त्याचें मन दुष्ट असे – नंतर त्याणें लवकरच कांहीं निमित्तें करून त्यांशीं उघड तंटा आरंभिला; तो असा. ते तिघेजण एकेदिवशीं माडीवर खेळत असतां धाकट्या दोघांनीं मस्करीनें असा बेत केला कीं, **राबर्ट** एथून खालीं निघून जाऊं लागला ह्मणजे त्याचे डोक्यावर पाणी टाकावें. [त्]याणीं तसें केलें. **राबर्टाचा** मनांत पहिल्यापासून वांकडें होतेंच; ह्मणून त्याणें मस्करीस खर्‍यावर नेलें; तेथें ए-

क

क त्याचे कृपेंतला मनुष्य होता, त्याणें त्यास अ-धीकच चिढिवलें; मग तो हातांत तरवार घेऊन सूड घ्यावा या मसलतीनें माडीवर गेला; तेव्हां लागलीच सर्व किल्यांत गडबड झाली. त्यावेळेस कसेंतरी करून तो त्याचा राग राजा उइलियमानें शांत केला; परंतु तेव्हांपासून कुटुंबांत जी बरकस लागली ती त्याचे हातून पुढें कधीं ही मिटली नाहीं.- मग राबर्ट कितिएक बरोबर लुच्चे सोबती घेऊन, त्याच रात्रीस रोएन किल्यावर हल्ला करायास गेला; परंतु तेथील अमलदार होता, त्याणे तो त्याचा बेत चालूं दिला नाहीं.

अशी घरचे घरांत आग पेटल्यावर नार्मंडी, मेन, आंजु, आणि ब्रिटनी एथील मोटमोटे जवान लोकानीं राबर्टाचा पक्ष धरिला. इतका तो भला आणि लोकांस प्रिय होता. कथा अशी आहे कीं त्याची आई त्यास चोरून द्रव्य पाठवी, आणि त्याचे बेतास आंतून अनुकूल असे. ही गडबड बहुत दिवस चालिली होती; ते-

णें.

णें करून **नार्मन** राज्यांत फार बखेडा पडला; म्ह- णून राजा **उइलियम** शेवटीं आपल्या मुलांचा प- राजय करायास **इंग्लिशांची** फौज जमा करू- न **नार्मेंडी** प्रांतांत गेला. तेथें युद्ध करून त्या- णें **रबर्ट** आणि त्याचे साथी यांस पळविलें.

हें काम संपवून राजा नुकताच रिकामा झाला; इतक्यांत, त्यास दुसरें एक मोठें दुःख झा- लें. त्याची राणी **माटिल्डा** होती ती मृत्यु पा- वली. विपत्ति याचाची झाली, म्हणजे सर्व दुः- खें एकदांच प्राप्त होताहेत. त्याणें दुसरी एक बा- तमी वेळाच ऐकिली कीं, उत्तरेकडील राज्यांत दं- गा चालिला आहे. तें ऐकून तो **ब्रिटेन** बेट सोडू- न त्या देशांत गेला; त्यावेळेस, त्यास समजलें कीं त्या दंगा करणारांस **फ्रानूस** देशाचे राजाचा आं- तून आश्रय आहे. त्या राजानें असी मसलत के- ली होती कीं, **नार्मनाचा** प्रांतांतले मोठमोठे लो- कांत वैमनस्यें पाडून, **नार्मनाचा** अमल कमी क- रावा; तसाच त्याणें **उइलियमाशीं** कांही

थट्टेचा

थट्टेचा व्यवहार केला, तेणेंकरून त्यास फारच वाईट वाटलें. **उइलियमाचें** पोट मोटें होतें, तन्निमित्त तो कांहीं दिवस दुखण्यांत पडला होता. तेव्हां **फ्रान्साचा** राजा **फिलिप** म्हणत असे, कीं **उइलियम** राजा बाळंत झाला आहे. तेणेंकरून **उइलियमास** बहुत क्रोध आला. मग त्याणें त्यास निरोप सांगून पाठविला कीं, मी बाळंत झालों आहें, तो लवकरच हिंडों फिरों लागेन, आणि प्रथम देवाचे पायां पडायास जाईन त्या वेळेस बहुत दिवे लावून सर्व **फ्रान्स** देश जाळून टाकीन. ही धमकी दिली ती सिद्धीस न्यायाकरितां त्याणें सैन्य जमा केलें, आणि **ऐल आफ फ्रान्स** प्रांतांत शिरून सर्व खेडीं जाळिलीं, आणि **मांट** शहर घेऊन तें धुळीस मेळविलें. या लढाईची वृद्धि पुढें झाली नाहीं. त्याचें कारण **उइलियम** राजाचा मृत्यु. तो असा झाला. **उइलियम** राजा घोड्यावर बसून जात असतां घोड्याचें पाऊल ऊन राखेंत पडलें. तें भाजतांच

घोडा

घोडा अकस्मात् उधळला, तेव्हां राजा जिनाचे शेवटावर पडला, आणि फार जखमी झाला. तेणें करून पुढें लवकर रोएन शहराजवळ एके खेड्यांत मरण पावला.

---

## प्रकरण ५

### उइलियम रुफस राजाची कथा



राजा **उइलियमाचा** पुत्र त्याच नावाचा होता. त्याचे केंसांचे तांबड्या रंगावरून त्याचें नाव **रूफस** पडलें होतें. राजा **उइलियमानें** आपले मृत्युपत्रांत असें लिहून ठविलें हो-

---

१ विलायती लोकांत अशी चाल आहे कीं, मरणसमयीं

तें कीं. माझ्या नंतर **उइलियमानें** राज्य करावें. त्याप्रमाणें तो **उइलियम इंग्लंडांत** राज्य करूं लागला. ते वेळेस त्याचा वडील भाऊ **राबर्ट नार्मेंडी** देशांतलें राज्य करीत होता. राजानें आपले मुलांस असे राज्याचे विभाग करून दिले, ही गोष्ट **नार्मन** देशाचे सभासदांस प्रथम पासूनच वाईट वाटली होती. त्यांचा मनांत असें होतें कीं पूर्वीप्रमाणें राज्य एकानें करावें. **राबर्ट** राजास सारे राज्याचा अधिकार आहे असें त्यांचें मत होतें. मग त्याणीं **उइलियम** राजावर मोठें बंड केलें, त्यांत मुख्य राजाचा चुलता **ओदो** नामें होता.

असा भयंकर प्रसंग आला हें समजून, राजा **उइलियम इंग्लिश** लोकांची प्रीति संपादन करायाचा उद्योग करूं लागला. त्यांस

---

मर्यी एकपत्र करून ठेवावें; त्यांत आपली संपत्ति इत्यादिकांची व्यवस्था कशी करावी हें लिहिलें असतें

त्याणें वचन दिलें कीं, तुह्मी माझा पक्ष धरिलात- र पुढें मी तुमचा ममतेनें प्रतिपाळ करीन, आ- णि तुह्मावर कृपादृष्टी ठेवीन: मग तो लवकरच लढायास सिद्ध होऊन गेला. त्याणें पुष्कळ फौ- ज जमा केली होती. तो लोकांस असें दर्शवी कीं, जो कोणी मला राज्याचा अधिकार नाहीं अ- सें ह्मणेल, त्याचा मी नाश करीन. त्या वेळेस **राबर्ट** राजानें जे कोणी आपले मित्र होते त्यांचे कुमके करितां फौज ठेवण्यास पैसा खर्चावा, त- सें न करून निरुपयोगी कामांत आपलें द्रव्य घा- लविलें, आणि लोकांस उगीच इनामें दिलीं. अ- सें केल्यामुळें त्याचें येणें संकेताप्रमाणें झालें ना- हीं– इकडे **उइलियम** राजानें आपला भाऊ या- याचे पूर्वींचे सर्व बंडें मोडून टाकायाचा उद्योग आरंभिला. त्यास असें करायास विशेष क- ठीण पडलें नाहीं; कारण, बंडवाल्यानीं **राबर्टा- चा** सांगण्यावरून कितिएक किल्ले घेतले होते खरे, परंतु राजाशीं प्रसंग पडतांच भिऊन ते

त्यास

त्यास शरण गेले. त्याणें त्यांस जीवदान दिलें. परंतु त्यांची सर्व संपत्ति जप्त करून त्यांस राज्याचे पार घालविलें.

कांहीं दिवसांनंतर त्या दोघां भावांमध्यें एक दुसरा तंटा झाला. तेणें करून **उइलियम राबर्टाचें** राज्य अधिकच चापीत चालिला. अशीं बंडें होत त्यामुळें राजास द्रव्य बहुत प्राप्त होत असे. असें जें कांहीं आपण मिळवी तें तो आपले खासगीचे खर्चीस लावी.

असे लहान सान बखेडे, आणि निरुपयोगी बंडें हीं सर्व, त्या वेळेस एक परम स्तुत्य आणि विचित्र अशी गोष्ट झाली ती खालीं झांकलीं गेलीं. ती गोष्ट अशी. **जिरुसिलम** शहर त्या वेळेस धर्मबाह्य लोकांचे हातीं होतें; आणि तेथ-

१ इशुक्रैस्त, ज्याणें इंग्लिश लोकांचा धर्म प्रवृत्त केला, त्याचा अंतकाळ **जिरुसिलम** या नावें एशिया खंडांत **सिरिया** देशांत एक शहर आहे तेथें झाला होता; म्हणून त्या शहरास **क्रिस्तियन** लोक पुण्य क्षेत्र असें मानितात. आणि तेथें यात्रेसही जातात.

ते

चे रहाणारे, **कैस्ताचे** मतानुसारी लोकांस दुःख देत असत. त्या पुण्यस्थानीं पापी लोकांचा अमल असावा ही गोष्ट फार वाईट, असें मनांत आणून त्या वेळेस सर्व **क्रिस्तियन** राजे व इतर जन यांणीं त्या लोकांवर चढून जाऊन, तें शहर घ्यायाची मसलत केली होती. तीं जीं युद्धें झालीं त्यास **क्रुसेड**[1] ह्मणतात. तो उद्योग करायाची गोष्ट लोकांचे मनांत प्रथम येण्यास कारण असें झालें. **पीटर** ह्मणून कोणी एक महंत होता, त्याचा जन्म **पिकर्डी**[2] प्रांतांतले **एमियनूस** शहरांत झाला होता. तो मोठा भक्तिमान्, धीर, आणि आस्थावान् असे. तो **जिरुसिलमाचे** यात्रेस गेला होता; त्या वेळेस तेथील अमलदार धर्मबाह्य लोक, ते **क्रिस्तियनास** परम दुःख देत, असें पाहून त्यास फार वाईट वाटलें.

---

१ क्रुसेड ह्मणजे धर्म राखाया करितां पापी लोकांशीं जें युद्ध तें. यास पुण्य युद्ध असेंही नाव ठेविलें आहे.

२ पिकर्डी प्रांत फ्रान्स देशांत आहे.

मग

मग तो पोपाच्या आज्ञेनें सर्व युरोप देशांत त्या लोकांशीं युद्ध करावें ही गोष्ट बनावून सांगत फिरला. तेव्हां सर्व लोक मोठ्या उत्साहानें युद्धास तयार झाले. त्याणीं आपले उजवे बावळ्यावर धर्माची खूण क्रूस[१] ह्मणून एक धारण केली. यद्यपि सर्व युरोप देशांत अशी धर्माविषयीं आस्था उत्पन्न झाली होती, तथापि लोक आपला स्वार्थ केवळ विसरले नव्हते. तें असें कीं कितिएक लोक, एशिया खंडांत आपण राहिलों असतां सुख पावूं या इछेनें, आपलें सर्वस्व विकून जो थोडा बहूत पैका आला तो घेऊन स्वस्थ बसले. कांहीं राजानीही हा उद्योग मनावर घेतला, त्यांत नार्मंडीचा ड्युक राबर्ट ही होता. त्या युद्धाचा बेत त्याचा मर्जीस आला कारण, तो शूर असोन निर्धन; कीर्ति मिळवाया विषयीं उत्सुक; आणि दंग्यामुळें कंटा-

---

१ क्रूस ह्मणजे + या आकाराची खूण. या आकाराचे काष्ठावर इशुक्रेस्तास फाशीं दिला ह्मणून ही खूण क्रिस्तियन लोक धारण करितात.

कलेला असा होता; तरीच त्यास फारफेर करा-
याची फार आवड असे. त्याणें लढाईचा बेत के-
ला; परंतु पैका पाहिजे तो त्याजवळ नव्हता, म्ह-
णून त्याणें आपला भाऊ **उइलियम** याकडे-
स बोलणें लाविलें कीं, माझें राज्य तुह्मा जवळ
गहाण ठेवितों, तुह्मी मला दहा हजार **मोर्क** द्या-
वें. **उइलियम** राजा त्याचें राज्य घ्यायास संधी
पहात होता, त्यास हें बरेंच झालें; मग त्याणें त्या
रीतीनें **राबर्टाचें** राज्य आपले हाता खालीं घा-
तलें.

**मेन** आणि **नार्मंडी** मुलूख प्राप्त झाले,
तेणेंकरून राजाचें राज्य अधिक वाढलें खरें, प-
रंतु त्याचें सामर्थ्य वृद्धि पावलें नाहीं. याचें का-
रण, त्याचा नव्या राज्यांतील लोक जुन्या प्रजा
पेक्षां विशेष स्वतंत्रपणानें वागणारे असे होते.
त्या लोकांस आज्ञा केली असतां, ती न ऐकतां, ते
कज्जा करीत. या करितां दंडुत बखेडे आणि

२ मार्क म्हणून एक नाणें या वेळेस होतें. त्याची किंम-
त सुमारें सांप्रतचे विलायती दो[illegible]ांड होते.

बंडें

बंडें उत्पन्न झालीं, तीं सर्व त्याणें मोडलीं. तो एक बंड मोडी इतक्यांत दुसरें उत्पन्न होई. या रीतीनें त्यास स्वस्थता नाहींशी झाली.

या सर्वांचा उपशम करून, स्तुति आणि निंदा या दोहोंची खातर न बाळगितां उइलियम राजा आपलें राज्य वाढवीत चालिला. हें असेंच आहे कीं ज्याची दृष्टि स्वार्थ साधण्याकडे असते तो लोकांची स्तुतीची किंवा निंदेची परवा करीत नाहीं. त्याचे राज्य मिळवायाचे उपाय दोन होते; एक खरेदी, आणि दुसरा लढाई. **पाइटियर्स** आणि **गेइन** या मुलखांतले: **अर्लानें** धर्मयुद्धास आयाचे मसलतीनें पुष्कळ फौज जमविली होती; परंतु तो उद्योग करायास पैका पाहिजे, तो त्या पाशीं नव्हता, ह्मणोन त्यास **उइलियम** राजाचे साहाय्याचें कारण पडलें. राज्य गहाण ठेविलें असतां, प्रजांचें काय होईल, हा विचार मनांत नकरितां, तो **उइलियम** राजाजवळ आपलें सर्व राज्य गहाण ठेवायास सिद्ध झाला. राजा **उइलियम**

लोभी

लोभी होताच; त्याणें तें लागलेंच गहाण घेतलें. असा मातबर मुलूख त्याचे जवळ विश्वासानें ठेविला, तो घ्याया करितां राजानें गलबतें व फौज तयार केली होती. परंतु पुढें कांहीं एक सहज गोष्ट घडली त्यामुळें त्याचे सर्व लोभाविष्टतेचे उद्योग तसेच राहिले. ती गोष्ट अशी; **न्यू-फारेष्ट** रानांत **सरवाल्टर टिरेल** या नावाच्या कोणी एक ग्रहस्थानें हरिणावर एक बाण टाकिला; तो चुकून राजाचे काळिजास लागला, तेणें करून तो तत्क्षणीं गत प्राण होत्साता खालीं पडला. त्यां वेळेस तो **सरवाल्टर** अतिशय भय पावून, घोड्यास टांच लावून पळाला; आणि गलबतांत बसून **फ्रान्स** देशांत गेला; तेथून पुण्य युद्धा करितां लोक **जिरुसिलमास** निघाले होते, त्यां बरोबर जाता झाला.

---

# प्रकरण ६

## प्रथम हेनरी राजाची कथा

## ज्याचें प्रतिष्ठानाव बोक्लार्क असें होतें.

## सन ११०० पासून ११३५ पर्यंत.



उइलियम राजा मेला त्यावेळेस त्याचा कनिष्ठ बंधु हेनरी न्यूफारेष्टांत पारधी करीत होता. त्याणें लागलीच ती संधि साधिली. तो मोठ्या त्वरेनें विंचेस्तर शहरांत जाऊन प्रथम जामदारखान्याचा बंदोबस्त करिता झाला; कारण त्यास ठाऊक होतें कीं, द्रव्यानें जसा आपला मतलब सिद्ध होईल, तसा दुसरे कशानें हो-

१ बोक्लार्क, ह्मणजे लिहिण्यामध्यें अति कुशल. त्याचें विद्येकडे अतिशय लक्ष्य असे, ह्मणोन हें नाव त्यास पडलें होतें.

णार

णार नाहीं. नंतर त्यास सर्व सरदार व इतरलोक अनुकूळ झाले; कांकीं, त्याशीं विरुद्ध व्हायास कोणास शक्ति नव्हती, आणि त्याणीं तसें केलें नसतें तर मोटा अनर्थ झाला असता.

हेनरी राजानें आपणावर लोकांची कृपा व्हावी या करितां, जे कोणी आपल्या भावाचे वेळचे हलके कारभारी होते, त्यांस दरबारांतून काढून लाविले. तथापि एक गोष्ट अशी राहिली होती कीं, तेवढी झाली म्हणजे त्याचें राज्य निर्भय व्हावें – ती अशी. इंग्लिश लोकांची त्या काळीं ही साक्सन राजांवर भक्ति होती. ते पुरातन साक्सन राजे पदच्युत झाले, ही गोष्ट इंग्लिशांचे मनांत मोटी वाईट वाटत असे त्या साक्सन राजांचे वंशांतील कितिएक मनुष्यें जीवंत होतीं, त्यांत एक माटिल्डा नामें एडगर-आथेलिंगाचे भावाची मुलगी होती. ती मठांत वाढली म्हणून वास्तवीक तिणें राज्याचा अभिमान सोडून वैराग्य धरिलें होतें. ती

महंतीण

महंतीण[१] झाली होती. त्या वेळेस राजाचा मनांत आलें कीं, इला आपण वरिली तर साक्सनांचें आणि नार्मनांचें फार दिवसांपासून जें वैमनस्य आहे तें मिटेल. परंतु त्यास प्रतिकूळ इतकेंच होतें कीं, ती एकवेळ महंतीण झाल्यावर तिशीं लग्न करितां येईना. असें असतांही, त्याचे मंत्र्यांस त्याचा पक्ष होता ह्मणून, त्याणीं तिशीं लग्न केल्यास चिंता नाहीं असें त्यास सांगीतलें - माटिल्डेस लग्न करायास अधिकार आहे अशी गोष्ट ठरल्यावर, त्या दोघांचें लग्न मोठ्या उत्साहानें होतें झालें.

राबर्ट राजा जिरुसिलमास गेला होता तो परत आला; आणि आपलें मूळचें राज्य घेऊन, इंग्लंडाचे प्रभुत्वाविषयीं बखेडा करूं लागला. हेनरी राजानें त्याशीं प्रथम स्नेहाचें बोलणें लाविलें. मग असें ठरलें कीं, हेनरीनें

१ लग्न करूं नये असा निश्चय करून नेहमी मठांत राहावें, अशी पूर्वीं चाल होती; अशा पुरुषाचें नाव महंत. आणि अशे स्त्रीचें नाव महंतीण.

त्यास अमुक द्रव्य दिलें म्हणजे **राबर्ट** राजास **इं-ग्लंडाचे** राज्याविषयीं कांहीं संबंध नाहीं; आणि त्या दोघां भावांतून एक जर निपुत्रिक मेला तर, दुसऱ्यानें त्याचें राज्य घ्यावें – असा तह ठरल्यानंतर, उभयपक्षांनीं आप आपले सैन्यास निरोप दिला. पुढें **राबर्ट** राजा आपले भावाजवळ दोन महिने पर्यंत परम प्रीतीनें राहून आपल्या राज्यास जाता झाला.

**राबर्ट** राजा मूर्खपणामुळें राज्य करावयास योग्य नव्हे, असें मगलवकरच दिसून आलें तें असें तो काम कारभाराविषयीं अतिशय अनुत्सुक होता; त्याचें लक्ष्य विषयसुख भोगण्याकडे फारच असे; आणि त्याचे सेवक त्यास फार लुटीत असत; तें त्याचे ध्यानांतही येत नसे. एकादे समयीं असें घडे कीं, त्याचीं वस्त्रें चोरून नेल्यामुळें तो सारा दिवस निजून राही. त्याचा अव्यवस्थित प्रकृतीपासून जें त्यास दुःख होई, त्यापेक्षें प्रजांस विशेष होत असे; कारण त्यावेळेस लबाड

आणि

आणि लोभी अशा लोकांचा हातीं राज्य होतें; तें ते निर्दयपणानें लुटीत असत. असा त्या वेळेस जुलूम चालिला होता. त्या संकटामुळें **नार्मन** लोक **हेनरी** राजास शरण गेले; त्यांस असें वाटलें कीं, जसा तो आपलें राज्य नीतीनें करितो आहे, तसेंच आमचे देशांचें राज्य करील; तेणें करून आम्ही सुख पावूं. त्या लोकांस दुःखापासून मुक्त केलें असतां आपलें हितच होईल; असें जाणून **हेनरी** राजानें त्यांस सांगीतलें कीं चिंता करूं नका, तुमचीं संकटें मी निवारण करीन. असें त्यांस वचन देऊन, त्याणें दुसरे वर्षीं मोठी फौज घेऊन **नार्मंडी** देशास जाऊन मोटमोटीं शहरें घेतलीं. दुसऱ्या लढाईंत **राबर्टाचे** सैन्याचा अत्यंत पराजय केला; आणि त्यास धरून आपल्या कैदेंत ठेविला. त्या राजा बरोबर दहा हजार फौज, आणि त्याची सर्व थोरथोर हितकारी मंडळी धरली गेली. हा विजय झाल्यानंतर सर्व **नार्मंडी** प्रांत **हेनरी** राजाचे स्वाधीन झाला. मग तो आ-

पला बंदिवान भाऊ यास बरोबर घेऊन **इंग्लंड** देशास गेला. जा **राबर्ट** राजानें आपलें सारें वय, शौर्य, औदार्य, आणि सत्य वक्तृत्व. यांत घालविलें होतें, त्याची त्या वेळस अशी अवस्था झाली कीं. बापाचे वेळच्या राज्याच्या विभागही त्यास न मिळतां, उलटा परतंत्रपणा प्राप्त झाला. त्याचें मन आपल्या विषयीं पूर्वीं कसें निर्दुष्ट होतें, हा विचार नकरितां, **हेनरी** राजानें तो मुरे पर्यंत त्यास कैदेंतून मुक्त केलें नाहीं. तो **राबर्ट** कैदेंत सांपडल्यानंतर अठ्ठावीस वर्षें होता, मग **ग्लामर्ग** प्रांतांत क्यार्डिफ किल्यावर मृत्यु पावला. कितिएक असें बोलतात कीं, **राबर्ट** राजाचे डोळ्यांस तांब्याचें भांडें तापवून लावून त्याचे डोळेही फोडले होते. अशीं आपल्या हातून क्रूर कर्मे घडलीं ह्मणून, **हेनरी** राजास पश्चात्ताप होऊन त्याणें **रेडिंग** शहरांत एक मठ बांधला. त्या वेळेस असें एकादें सत्कर्म केलें, ह्मणजे सर्व पातकें दूर होतात, असा समज असे

से.

हेनरी राजास दैव परम अनुकूळ होतें, तेणेंकरून तो बहुत दिवस सुख भोगील, असा योग दिसत होता. तें असें. त्याणें दोन प्रबळ राज्यें मेळविलीं. त्यास एक पुत्र होता; त्यावर त्याची फार प्रीति असे. तो मुलगा अठरा वर्षांचा झाला त्या वेळेस लोकांनीं तो राजा मान्य केला. त्याची मुलगी माटिल्डा नामें जर्मनीचा राजा पांचवा हेनरी यास दिली होती; ती आठ वर्षांची झाली, तेव्हांपासून तिला विद्याभ्यासाकरितां त्या दरबारांत पाठविली होती. अशा त्या हेनरी राजाचा सर्व सुखेच्छा अकस्मात् कांहीं संकटें प्राप्त होऊन निष्फळ झाल्या, त्यामुळें पुढें जन्मवर त्यास फारच दुःख झालें. तें वर्तमान असें. राज्य अनायासें प्राप्त झालें होतें, त्यामुळें त्याच्या मनांत भय होतें कीं, माझा राज्याचा नाशही व्हायास उशीर लागणार नाहीं म्हणून त्याणें प्रथमच सर्व इंग्लंडांतील संस्थानाचे अधिपति होते, त्यांकडून

आपले मुलास राजा असें कबूल करविलें; आणि त्यास आपले बरोबर घेऊन नार्मंडींतील सरदार लोकांपासू शपथे घ्याया करितां तेथे गेला. तो समारंभ होऊन मोठ्या उत्साहानें इंग्लंडांत जात असतां, त्याणें तेथील मुख्य मुख्य अनुरक्त लोक पुष्कळ बरोबर घेतले. ते समयीं राजाचा मुलगा आपले सोबती मंडळीसहवर्तमान, एके गलबतांत बसून मौजनें स्वतंत्रपणें जात होता. राजा ज्या तारवांत बसला होता तें बार्फ्लुअर बंदरांतून निघालें. त्यास वारा चांगला लागून तें जमीन दिसेना इतकें दूर गेलें. परंतु त्याचा मुलगा बसला होता तें वाऱ्याचा प्रतिबंधामुळें पुढें गेलें नाहीं. त्या वेळेस त्या तारवावरचे खलाशी लोक व त्यांचा क्यापटन फिझ्स्टीफन नामें होता तो दारु

---

१ राजा आपण राज्य भार पुत्राचे स्वाधीन करणार झाला, म्हणजे सरदारांपासून शपथ घेतो, किं आम्ही तुजजवळ जसे वागलों तसेच तुझ्या पुत्राजवळ वागों.

२ बार्फ्लुअर गांव नार्मंडी प्रांतांत आहे.

पियाला; तेणेंकरून त्यास शुद्ध नाहींशी झाली. तेव्हां तें गलबत एके खडपावर आपटून त्याचे तुकडे झाले. मग खलाशीलोक राजपुत्रास एके होडींत घालून नेत होते; त्या युक्तीनें त्याचा प्राण वांचला असता, परंतु त्याचे बापाचे राखेचा पोटची एक माद या नावें मुलगी होती, ती खडपावर ओरडूं लागली, तें ऐकून त्यास दया आली. एकवेळ तो प्राण संकटांतून मुक्त झाला होता; परंतु आपलें आवडतें मनुष्य मरतें तें वांचवाया करितां आपण यत्न केल्यावांचून कसें रहावें, असें मनांत आणून त्याणें नावाड्यांस होडी माघारें नेऊन तिला आंत घ्यायाची आज्ञा केली. होडी अवळ आली अशी पाहून त्या खडपावर दुसरे जे कितिएक लोक पडले होते, त्यांस आपले जीवाची आशा येऊन, त्याणीं आंत उड्या टाकिल्या. मग ती होडी भारानें चेंपून बुडाली; आणि आंतील सर्व मनुष्यें मरण पावलीं. त्या समयीं इंग्लंड आणि नार्मेंडी या देशांतील मोट मोट्ये लोकांचे